# चतुर कासव

एका कोल्ह्याला खूप भूक लागली होती.

अन्नाच्या शोधात त्याने पूर्ण जंगले पालथे घातले.





नदीच्या काठाजवळ त्याने एक कासव पहिले. त्याने ते पकडले.

पण कासवाचे कवच खूप कडक असल्यामुळे कोल्हा कासवाला खाऊ शकला नाही.



"कोल्होबा! मला थोडा वेळ पाण्यात भिजत ठेवा, म्हणजे माझे कवच मऊ पडेल आणि मग तुम्ही मला खाऊ शकाल." कासवाने सुचवले.



कासवाच्या सांगण्यावर कोल्ह्याचा विश्वास बसला. त्याने कासवाला पाण्यात सोडले.

कासव पटकन कोल्ह्यापासून दूर गेले आणि पोहत पोहत सुरक्षित ठिकाणी पोहोचले.

मराठी अनुवाद - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कुत्रा आणि हाड

एक कुत्रा तोंडामध्ये मांसाचा तुकडा घेऊन एका पुलावरून चालला होता.



अचानक त्याला पाण्यामध्ये स्वतःचे प्रतिबिंब दिसले. त्याला वाटले वेगळा कुत्रा आहे. तो प्रतिबिंबावर भुंकू लागला.

त्याच्या तोंडातला मांसाचा तुकडा पाण्यात पडला.



# दोन बेडूक



त्या वर्षी खूप तीव्र उन्हाळा होता. सर्व तळी आणि डबकी सुकून गेली होती.

दोन बेडूक राहायला नवीन जागा शोधू लागले.

त्यांना एक विहीर सापडली.

"चल आत उडी मारू. आत खूप पाणी आहे. आपण आनंदात राहू!" एक बेडूक म्हणाला.

"नको!" दुसरा म्हणाला. "आत्ता इथे पाणी आहे, पण जर ते सुद्धा सुकले तर आपण बाहेर पडूच शकणार नाही."



मराठी अनुवाद - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614; Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# लोमड़ी और अंगूर



कोणे एके काळी, एक कोल्हा होता. एक दिवस त्याला खायला काहीच अन्न मिळाले नाही.

कोल्हा खूप भुकेला होता. त्याला एका वेलीवर लटकणारा द्राक्षांचा घड दिसला. त्याच्या तोंडाला पाणी सुटले.

त्याने खूप उड्या मारल्या, पण द्राक्षांपर्यंत पोहोचू शकला नाही.

लवकरच तो दमला. "ही आंबट द्राक्ष मला नकोतच!" असा विचार करून तो पुन्हा जंगलात निघून गेला.



# सिंहाच्या कातडीतील गाढव

खूप खूप वर्षांपूर्वी, एक गाढव होते. त्याला सिंहाची कातडी सापडली. त्याने ती स्वतःभोवती पांघरली.

सर्वांना वाटले की हा तर सिंहच आहे. लोक घाबरले. प्राणी सुद्‌धा घाबरले. गाढव न घाबरता छाती फुगवून इकडे तिकडे फिरू लागले.



एक दिवस खूप जोराचा वारा सुटला, आणि सिंहाची कातडी उडून गेली. गाढवाचे रहस्य उघडे पडले!

"हे तर गाढव आहे! आणि आपण समजत होतो सिंह आहे!" लोक म्हणाले. लोकांनी गाढवाला गावातून बाहेर पळवून लावले.

मराठी अनुवाद - मानसी महाजन



A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions



# पक्षी आणि मुंगी

कोणे एके काळी, एक पक्षी होता.

आणि एक मुंगी होती.

दोघे एका झाडावर राहत होते.

एक दिवस खूप पाऊस पडू लागला.
मुंगी पाण्याने वाहून जाऊ लागली.



हे पाहताच पक्षाने काही पाने तोडून पाण्यात टाकली.

मुंगी एका पानावर चढली आणि तिचे प्राण वाचले.





एक दिवस एक पारधी
जंगलात आला.

त्याला पक्षी दिसला आणि
त्याने पक्षाला मारण्यासाठी
धनुष्य रोखले. हे बघताच
मुंगीने पारध्याच्या पायाचा
कडकडून चावा घेतला.

पारधी कळवळला
आणि त्याच्या
बाणाचा नेम
चुकला.

पक्षी सुरक्षित
ठिकाणी उडून गेला.

मराठी अनुवाद - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# घोडा आणि गोगलगाय



एक होता घोडा. तो खूप घमंडी होता. त्याला एक गोगलगाय दिसली. तिला हळू हळू चालताना बघून घोड्याला तिला चिडवायची हुक्की आली. "अगं गोगलगायी! चल शर्यत लावायची का?" त्याने विचारले.



गोगलगायीला घोड्याचा राग आला.

"बरं, चालेल. रविवारी शर्यत लावू!" ती म्हणाली.





गोगलगाय घरी गेली, आणि तिने इतर सर्व गोगलगायींना एकत्र जमवले. त्यांना शर्यतीबद्‌दल सांगितले. सर्वांनी मिळून घोड्याला अद्‌दल घडवायची योजना आखली.

रविवारी सर्व गोगलगायी अगदी लवकर घराबाहेर पडल्या.

शर्यतीच्या सुरुवातीच्या जागेपासून शर्यत संपणार होती तिथपर्यंत थोड्या थोड्या अंतरावर गोगलगायी एक एक करून लपून राहिल्या.



शर्यत सुरु झाली. घोडा थोडा वेळ पळाला आणि त्याने समोर पहिले. समोर गोगलगाय! घोड्याने आपला वेग वाढवला. तरी समोर गोगलगाय! घोडा अजून अजून जोरात धावू लागला.

कितीही जोरात धावायचा प्रयत्न केला तरीही गोगलगाय घोड्याच्या पुढेच होती!

दमून भागून शेवटी घोड्याने हार मानली.

"मी हरलो!" तो निमूटपणे म्हणाला.

मराठी अनुवाद - मानसी महाजन



A Bagful of Stories

*Published by*

Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions





# सिंह आणि उंदीर

शिकार करून दमलेला सिंह आराम करण्यासाठी पडला,आणि त्याला गाढ झोप लागली.

जवळच्या बिळातून एक उंदीर बाहेर आला. सिंहाच्या अंगावरून दुडूदुडू धावू लागला.





सिंहाला जाग आली. त्याने उंदराला पकडले. झोप मोडल्यामुळे तो खूप रागावला होता.

"सिंह महाराज! मला सोडून द्या. तुमच्यावर संकट येईल तेव्हा मी नक्की तुम्हाला मदत करेन." उंदराने गयावया केली.

"हा! हा! हा! तू मला कशी काय मदत करणार? तुझ्यावर दया येते आहे म्हणून तुला सोडून देतो. जा पळ!" सिंह गुरकावला.

उंदीर लगेच बिळात नाहीसा झाला.

अनेक दिवस गेले.

एके दिवशी सिंह शिकाऱ्याच्या जाळ्यात अडकला. खूप प्रयत्न करूनही तो जाळ्यातून स्वतःला सोडवू शकत नव्हता. सिंह गर्जना करू लागला.

उंदराने सिंहाची गर्जना ऐकली. तो लगबगीने सिंहाजवळ आला.

"महाराज! तुम्ही त्या दिवशी मला जीवनदान दिले होते! आज मी तुम्हाला मदत करेन." तो म्हणाला.

आपल्या तीक्ष्ण दातांनी उंदराने जाळे कुरतडून टाकले. सिंह जाळ्यातून सुटला.



# माठ आणि तवा



कोणे एके काळी, एक होता माठ आणि एक होता तवा.

"तव्या! मी तुला मारेन!" माठ म्हणाला.

तव्याने शांतपणे उत्तर दिले, "तू मला मारलेस काय, आणि मी तुला मारले काय, फुटणार तर तूच!"

मराठी अनुवाद - मानसी महाजन



**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# मांजराच्या गळ्यात घंटा

एका गोदामात एक मांजर राहत असे.

अनेक उंदीर सुद्धा राहत असत. उंदीर मांजराला घाबरत.





मांजर रोज काही उंदरांची शिकार करून त्यांना खाऊन टाके.

मांजरीपासून कशी सुटका करून घेता येईल या विचारात सर्व उंदीर होते.

उंदीर एकत्र जमले आणि विचार करू लागले.
"काय करावे? काय करावे?"

एक उंदीर म्हणाला, "मांजराच्या गळ्यात घंटा बांधूया!"



"फारच छान युक्ती आहे" सगळे म्हणाले.

पण मांजराच्या गळ्यात घंटा बांधणार कोण?

मराठी अनुवाद - मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# विचित्र अंडं

खूप जुनी गोष्ट आहे. एक ससा होता. त्याला एक चेंडू सापडला. चेंडू मोठा आणि रंगीत होता. सशाने चेंडू उचलून जवळून पहिला. चेंडू कडक होता.

"किती मोठं आहे! कोणाचं अंडं असेल हे?" सशाला प्रश्न पडला.





सशाने कासवाला बोलावले.

"हे वाघाचं अंडं आहे का?" त्याने विचारले.

"नाही, नाही. वाघाचं अंडं एवढं मोठं नसतं. हे वाघाचं अंडं नक्कीच नाही. " कासव म्हणाले.



सशाने माकडाला बोलावले.

"हे उंटाचं अंडं आहे का?" त्याने विचारले.

"नाही, नाही. हे उंटाचं अंडं नाही. उंटाचं अंडं रंगीत नसतं." माकड म्हणाले.

सशाने करकोच्याला बोलावले.

"हे हत्तीचं अंडं आहे का?" त्याने विचारले.

करकोच्याने अगदी जवळून चेंडू पहिला. चेंडूवर चोच मारली.

चेंडू फुटला, आणि त्यातून फुस्स्स्स आवाज करत हवा बाहेर येऊ लागली.

"समजलं! हे तर हवेचं अंडं आहे!" करकोचा म्हणाला.





"हो! बरोबर! हे नक्कीच हवेचं अंडं आहे!" ससा, कासव आणि माकड आनंदाने उड्या मारत म्हणाले.

मराठी अनुवाद - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# चलाख कोंबडा

एकदा एका कोल्ह्याला खूप भूक लागली. तो अन्नाच्या शोधात निघाला. एका झोपडीच्या छतावर त्याला एक कोंबडा दिसला. कोल्ह्याला कोंबड्याला जमिनीवर आणण्याची युक्ती सुचली.



"कोंबडे दादा! किती दिवसांनी दिसत आहात! तुमची तब्येत खूप खराब झालेली दिसते. अगदीच बारीक झाले आहात. कमजोरही दिसत आहात. इकडे खाली या, मी तुमची नाडी तपासतो, आणि तुमच्या तब्येतीला काय झाले आहे याचे निदान करतो." कोल्हा अगदी जिव्हाळ्याने म्हणाला.

"खरे आहे, प्रिय मित्रा!" मी खूप कमजोर झालो आहे. खाली सुद्धा उतरता येत नाही आहे!" चलाख कोंबड्याने उत्तर दिले.

कोंबडा खूप चलाख आहे हे कोल्ह्याला समजले, आणि तो तिथून निघून गेला.



# मी नाही करणार!

एका माणसाने मुल्लाला पत्र लिहायला सांगितले.
"पत्र कुठे पाठवायचे आहे?" मुल्ला ने विचारले.
"बगदादला." माणूस म्हणाला.
"मग क्षमा करा. मी बगदादला नाही जाऊ शकत." मुल्ला म्हणाला.



"अहो, तुम्ही तिथे जाण्याची काही गरज नाही! पत्र पोहोचेल. "माणसाने समजावले.

"खरे आहे." मुल्ला म्हणाला, "पण माझे हस्ताक्षर बगदाद मध्ये कोणाला समजणार? ते वाचण्यासाठी मलाच तिथे जावे लागेल!"

मराठी अनुवाद - मानसी महाजन



A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# सात मासे

खूप जुनी गोष्ट आहे. एक राजा होता. त्याला सात पुत्र होते. एक दिवस सर्व राजपुत्र मासे पकडण्यासाठी गेले. प्रत्येकाने एक एक मासा पकडला.

त्यांनी मासे उन्हात वाळवले. एक वगळता बाकी सर्व मासे वाळले.





"माशा, माशा, तू का नाही वाळलास?" ज्या राजपुत्राने तो मासा पकडला होता, त्याने विचारले.

"गवताच्या ढिगाने सूर्य अडवला म्हणून!" मासा म्हणाला.

"गवताच्या ढिगा, गवताच्या ढिगा! तू सूर्य का अडवलास?" राजपुत्राने विचारले.

"गायीने मला खाल्ले नाही म्हणून!" ढीग म्हणाला.

"गायी, गायी! तू गवत का नाही खाल्लेस?" राजपुत्राने विचारले.

"गुराख्याने मला बांधलेली दोरी सोडली नाही म्हणून." गाय म्हणाली.

"तू दोरी का नाही
सोडलीस?" राजपुत्राने
गुराख्याला विचारले.



"आजीने मला जेवण दिले
नाही म्हणून." गुराखी
म्हणाला.

"आजीबाई, आजीबाई! तुम्ही
त्याला जेवण का नाही
दिले?" त्याने विचारले.

"माझा छोटा मुलगा रडत
होता म्हणून." आजीबाई
म्हणाल्या.



"छोट्या मुला, छोट्या मुला!
तू का रडतोस?" त्याने
विचारले.



"मला मुंगी चावली!"
छोट्या मुलाने सांगितले.

"मुंगी, मुंगी, तू का चावलीस?"
राजपुत्राने विचारले.

"माझ्या सोनेरी
वारुळात तुम्ही बोट
घातले तर मी
चावणार नाही का?"
मुंगी म्हणाली.



मराठी अनुवाद - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# पांढरा कावळा

खूप खूप वर्षांपूर्वी, कावळे पांढरे असत, अगदी बगळ्यांसारखे पांढरे शुभ्र!





त्या काळात, रंगार्याचे
काम घुबड करत असे.

कावळ्याला वाटे, आपले
पंख निळे हवेत!

तो घुबडाकडे गेला. घुबडाने एका डब्यात थोडा निळा रंग तयार केला. कावळ्याला दुसऱ्या डब्यावर उभे केले, आणि त्याचे पंख निळे रंगवू लागला.



तेवढ्यात कावळ्याचा पाय घसरला आणि तो त्या डब्यात पडला.



जेव्हा कावळा बाहेर आला,
तेव्हा कोळश्यासारखा काळा
झाला होता!



कावळा चिडला, आणि घुबडाला चोच मारायला सरसावला. घुबड पटकन उडून गेले.

तेव्हापासून सगळे कावळे काळे झाले. अजूनही कावळे घुबडांवर राग धरून आहेत. त्यामुळे घुबडे दिवस उडत नाहीत, फक्त रात्री घरट्यातून बाहेर येतात, कारण काळोखात कावळ्यांना दिसत नाही!



मराठी अनुवाद - मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कुरूप चेहरा



एक दिवस मुल्ला त्यांच्या मित्राबरोबर रस्त्यावरून चालले होते. त्यांना रस्त्यावर एक चमकणारी वस्तू दिसली.

मुल्लांनी खाली वाकून ती वस्तू उचलली. तो होता एक आरसा.

परंतु उचलल्याबरोब्बर त्यांनी तो लगेच फेकून दिला.

"किती कुरूप चित्र आहे! कोणीतरी टाकून दिले असणार. एवढी कुरूप गोष्ट कोणाला हवीशी वाटेल?" ते म्हणाले.

# पत्र

एक दिवस मुल्ला नसीरुद्दीनकडे एक माणूस वाचून घेण्यासाठी पत्र घेऊन आला.

मुल्लांनी काही वेळ ते पत्र पहिले.

"ही भाषा मला समजत नाही." ते म्हणाले.



"स्वतःला ज्ञानी विद्वान म्हणवता, डोक्यावर पगडी घालता, आणि साधे पत्र वाचता येत नाही?" तो माणूस वैतागून म्हणाला.

"बरं, हे घे! माझी पगडी घे, आणि आता तूच वाच तुझे पत्र," मुल्ला म्हणाले.

मराठी अनुवाद - मानसी महाजन



# मनी माऊ

मनी माऊ, मनी माऊ
कुठे जाऊन आलीस?

राजवाड्यातल्या राणीला
पाहून मी आले.

मनी माऊ, मनी माऊ
काय मजा केलीस?

खुर्चीखालच्या उंदराला
घाबरवून आले!





# पतंग, पतंग

वर वर वर उडतो पतंग
आकाशावर जातो पतंग
लाल, हिरवे रंगीत पतंग
मला तर भारी आवडे पतंग.



मराठी अनुवाद - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# निळा कोल्हा

एक कोल्हा होता. त्याने अन्नाच्या शोधात अख्खे जंगले पालथे घातले, पण त्याला काहीच खायला मिळाले नाही.

तो जंगलाजवळच्या गावात गेला.





गावात एका मोठ्या पिपात कपडे
रंगवण्यासाठी नीळ भरून ठेवली होती.

कोल्हा चुकून त्या पिपात पडला.
डोक्यापासून पायापर्यंत निळा रंगला!

कोल्हा धावत धावत जंगलात आला. जंगलातल्या प्राण्यांनी निळ्या कोल्ह्याला पहिले. या नवीन प्राण्याची त्यांना भीती वाटली. वाघ सुद्धा या नवीन प्राण्याला घाबरला!

निळ्या कोल्ह्याने प्राण्यांना जवळ बोलावले.



"हे पहा! मी एक दिव्य प्राणी आहे! तुम्ही मी सांगतो ते सगळे तुम्ही ऐकले पाहिजे. आज पासून मी तुमचा राजा!" तो म्हणाला. सर्व प्राण्यांनी हे मान्य केले.

काही दिवसांनी पौर्णिमा आली. पूर्ण चंद्र पाहून कोल्ह्यांनी कोल्हेकुई सुरु केली. निळ्या कोल्ह्यानेसुद्धा त्यांच्या सुरत सूर मिसळला.

त्याची कोल्हेकुई ऐकून प्राण्यांना समजले, हा तर साधा कोल्हा आहे! सर्वांनी मिळून त्याला हाकलून लावले.

मराठी - मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# सोन्याचे अंडे देणारे बदक

कोणे एके काळी, एका खेड्यात एक म्हातारा-
म्हातारी राहत होते.
यांच्याकडे एक बदक होते.



हे बदक रोज एक सोन्याचे अंडे देई!

एक दिवस त्यांच्या मनात विचार आला. "हे बदक रोज एक सोन्याचे अंडे देऊ शकते, तर त्याच्या पोटात किती सोन्याची अंडी असतील!"

त्यांना वाटले, या बेडकाचे पोट फाडले, तर त्यातील सगळीच सोन्याची अंडी आपल्याला मिळतील!

त्यांनी लगेच सुरी घेऊन बदकाचे पोट फाडले.





परंतु पोटामध्ये एकही अंडे नव्हते. सामान्य बदकांप्रमाणेच त्याचे शरीर हाडा-मांसाचे बनलेले होते.

सोन्याचे अंडे देणाऱ्या बदकाला मारल्याबद्दल म्हातारा-म्हातारीला खूप पश्चात्ताप झाला.

# एक दोन ....





एक दोन एक दोन
दारापाशी आले कोण?

तीन चार तीन चार
धावून धावून दमले फार!





पाच सहा पाच सहा
काठ्या गोळा केल्या पहा.



सात आठ सात आठ
पाढे माझे झाले पाठ

नऊ दहा नऊ दहा
आता पुरे! आणा चहा!

# सहा छोटी बदके

मला ठाऊक आहेत सहा बदके छोटी,
काही मोठी काही ठेंगणी आणि काही बुटकी.

त्यांच्यामधले एक, दिसले जरी साधे
शेपटीवरती पीस लावून, सर्वांपुढे चाले.

मराठी - मानसी महाजन




**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**
12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# बगळा आणि कोल्हा

एक होता कोल्हा. त्याच्या घशात हाडाचा तुकडा अडकला. त्याला खूप दुखत होते, पण अडकलेला तुकडा काढायला कोणाची मदत मिळेना. कोल्हा तसाच विव्हळत जंगलात फिरत होता.



शेवटी त्याला एक बगळा भेटला. "बगळे दादा! माझ्या घशात हाड अडकले आहे. कृपया ते काढ, तुझे खूप उपकार होतील. मी तुला एक भेट सुद्धा देईन." कोल्हा विव्हळला.

"बरे, प्रयत्न करतो." बगळा म्हणाला.

कोल्ह्याने आ वासला.





बगळ्याने त्याची लांब चोच कोल्ह्याच्या घशात घातली आणि हाड बाहेर काढले.

"माझी भेट कुठे आहे?" त्याने विचारले.

कोल्हा हसू लागला. "कोल्ह्याच्या घशात डोके घालूनही तू अजून जिवंत आहेस. हीच खूप मोठी भेट आहे! त्यावर खुश राहा!“ कोल्हा हसून म्हणाला.

# झाड आणि वेळू



एक खूप मोठा वृक्ष होता.
त्याशेजारी एक वेळू होता.

हलका वारा आला तरी वेळू हलू लागे, वाऱ्यावर झुलू लागे. वृक्ष याबद्दल त्याला चिडवत असे.

वेळू मात्र काही बोलत नसे.

एक दिवस खूप मोठे वादळ आले. वेळू पुढे वाकला, मागे वाकला, वारा येईल तसा वाकला पण वादळात तग धरून राहिले.

वृक्ष वाकू शकत नव्हता. वाऱ्याच्या जोरामुळे तो तुटून पडला.



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# हावरट उंदीर

घराच्या दाराला एक छोटे भोक पडले होते.

त्यातून एक उंदीर आत आला. घरात त्याला भरपूर खायला प्यायला दिसले.



उंदीर खुश झाला. तडस लागेपर्यंत त्याने खा खा खाल्ले. खाऊन झाल्यावर तो भोकातून बाहेर जायचा प्रयत्न करू लागला.

पण खाऊन खाऊन फुगलेल्या पोटामुळे तो आता भोकात मावेना. बाहेर जाऊ शकेना.



# वाचू शकणारे गाढव

ताताचारी हा रामलिंगाडूचा शेजारी होता.

तो सारखा काही ना काही कुरापती करत असे. रामलिंगाडूचे आणि ताताचारीचे अजिबात पटत नसे.

एक दिवस ताताचारीने रामलिंगाडूला पत्र लिहिताना पाहिले. रामलिंगाडू पत्रात काय लिहित असेल हे जाणून घ्यायची त्याला उत्सुकता वाटली.

तो हळूच रामलिंगाडूच्या मागे जाऊन उभा राहिला आणि मान लांब करून पत्र वाचायचा प्रयत्न करू लागला.

रामलिंगाडूला त्याची चाहूल लागली.



रामलिंगाडूने मुद्दाम लिहिले: "माझ्या मागे एक गाढव आहे. इतरांची पत्रे वाचण्याची त्याला खोड आहे. मला पत्रात अनेक गोष्टी लिहायच्या आहेत, पण त्या गोष्टी गाढवाला माहित होणे बरे नाही. त्यामुळे मी त्या लिहीत नाही." असे म्हणून त्याने पत्र संपवले.

ताताचारीने हे सगळे वाचले. तो रागाने धुमसत होता, पण करेल काय? त्याने शांतपणे तिथून पोबारा केला.



# चला करा!





लंगडी घाला
उड्या मारा
भरा भरा भरा





थोडे धावा
थोडे बागडा
गुडघे हातात धरा





थोडे वाका
अंग ताणा
मान गोल फिरवा





जांभई देऊन
डोळे मिटा
गाढ तुम्ही झोपा.

मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# शेपट्यांच्या समस्या



एक होता उंदीर. त्याला चार शेपट्या होत्या.
त्याला त्याच्या शेपट्या फार आवडत, पण इतर उंदीर त्याला चिडवत.
"चार शेपट्यांचा उंदीर! चार शेपट्यांचा उंदीर!"





त्याने शेवटी एका म्हाताऱ्या उंदराला आपली एक शेपटी कापून टाकायला सांगितली. "जरूर!", म्हातारा उंदीर म्हणाला आणि त्याने उंदराची एक कापून टाकली. आता चार शेपट्यांच्या उंदराला तीनच शेपट्या उरल्या.



आता इतर उंदीर त्याला चिडवू लागले, "तीन शेपट्यांचा उंदीर, तीन शेपट्यांचा उंदीर!"

तो पुन्हा त्या म्हाताऱ्या उंदराकडे गेला आणि आपल्या तीन शेपट्यांपैकी एक शेपटी कापून घेतली.





आता त्याला दोन शेपट्या उरल्या. तरीही इतर उंदीर चिडवायचे बंद नाही झाले. "दोन शेपट्यांचा उंदीर! दोन शेपट्यांचा उंदीर!"



उंदराने आपली अजून एक शेपटी कापून घेतली. तरीही इतर उंदीर त्याला चिडवणे थांबवेनात.



"एका शेपटीचा उंदीर! एका शेपटीचा उंदीर!"

त्यांचे चिडवणे सहन न होऊन, उंदराने आपली शेवटची शेपटी सुद्धा कापून घेतली.
त्याला वाटले - आता तरी इतर उंदीर चिडवायचे थांबतील!
पण आता ते चिडवू लागले "बिन शेपटीचा उंदीर! बिन शेपटीचा उंदीर!"



A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam

मराठी - मानसी महाजन

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# बाबा...वाघ आला!

एका गावात एक मुलगा राहत असे. तो रोज आपल्या मेंढ्या जंगलात चरायला नेत असे.



एक दिवस त्याला सगळ्यांची फजिती करण्याची हुक्की आली. "बाबा...वाघ! वाघ आला वाघ!" तो ओरडू लागला.

त्याचे वडील आणि बाकी अनेक लोक कामे सोडून धावत आले. "कुठे आहे वाघ?" त्याच्या वडिलांनी विचारले.

मुलगा हसू लागला. "वाघ बीघ काही नाही बाबा! मी तुमची गम्मत केली!"





थोड्या दिवसांनी त्याने पुन्हा तसेच केले. "बाबा...वाघ आला! तो मेंढ्या खात आहे!" तो ओरडला. पुन्हा अनेक माणसे धावत आली.

"मी तर गम्मत करत होतो," मुलगा म्हणाला. मुलाला रागावून, समज देऊन सगळे आपापल्या कामाला परतले.

एक दिवस खरेच वाघ आला! "बाबा...वाघ आला! लवकर या!" मुलगा घाबरून ओरडू लागला.

"त्याच्याकडे अजिबात लक्ष देऊ नका. तो नुसत्या खोड्या करतो." लोक म्हणाले. कोणीही त्याच्या हाकेला धावून आले नाही.

वाघ त्याची मेंढी घेऊन जंगलात पळून गेला.




मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कोंबडी आणि सुई

खूप पूर्वी कोंबडी आणि गरुड मित्र होते. ते दोघे नेहेमी सोबत राहत.

एकदा गरुडाला दूर त्याच्या घरी जावे लागले. जाताना त्याने कोंबडीला एक सुई दिली.

"ही सुई तुझ्या जवळ ठेव. मी परत आलो की तुझ्याकडून घेईन." गरुड म्हणाला.





कोंबडीने सुई आपल्या पिसांमध्ये जपून ठेवली, परंतु अन्न शोधत असताना सुई कुठेतरी पडली. खूप शोधली तरी कोंबडीला सुई सापडली नाही.

गरुड परत आला. त्याने सुईबद्दल कोंबडीला विचारले. "सुई पडून गेली", कोंबडी उदासपणे म्हणाली.

गरुड चिडला. त्याने ताबडतोब कोंबडीला सुई शोधायला सांगितले. "तू सुई शोधून आणत नाहीस तोपर्यंत मी तुझ्या पिल्लांना खाणार!", गरुडाने धमकी दिली.

तेव्हांपासून कोंबडी आणि गरुड एकमेकांचे शत्रू झाले. गरुड सतत कोंबडीच्या पिल्लांना उचलून नेऊ पाहत असतो, आणि कोंबडी त्याला पळवून लावत असते.



कोंबडीने सुई शोधण्यासाठी आपल्या नातेवाईकांची मदत घेतली. चोचीने, नखांने अजूनही कोंबड्या सुई शोधत फिरत असतात.

# काय वाजे काय वाजे?

गड गड गड गड ढम ढम ढम ढम काय वाजे काय वाजे?
ढगात लपल्या म्हातारीचे जाते चाले जाते चाले.

टप टप टप टप धो धो धो धो काय वाजे काय वाजे?
रागे भरले आई बाबा ढगोबा मग रडू लागे.

सर सर सर सर सुईं सुईं सुईं सुईं काय वाजे काय वाजे?
आकाशातील प्रचंड पक्षी वेगे वेगे उडू लागे.

झुळ झुळ झुळ झुळ झुळ झुळ झुळ झुळ काय वाजे काय वाजे?
होड्या सोडा माझ्यामध्ये असे झऱ्याची शीळ सांगे.



मराठी –
मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कंजूस

एक कंजूस माणूस होता. त्याने त्याच्याजवळचे सगळे सोने एका पेटाऱ्यात ठेवले आणि पेटारा मातीत पुरून लपवून ठेवला. रोज कोणी बघत नाही असे पाहून तो पेटारा उकरून काढे, आणि आपल्या खजिन्याकडे टक लावून पाहत बसे. खजिना पाहून त्याला खूप आनंद होत असे.

एका माणसाने त्याला असे करताना पहिले.



त्या माणसाने रात्रीतून
पेटारा चोरला.
दुसऱ्या दिवशी कंजूस
माणूस आला आणि बघतो
तर पेटारा गायब!



सोने चोरीला गेले म्हणून तो रडू लागला. "चोरी गेलेल्या सोन्याबद्दल रडतोस कशाला? तसेही तू त्या सोन्याचा काही उपयोग करत नव्हतास. नुसत्या खड्ड्याकडे पहा आणि खुश राहा! सोने काय आणि माती काय, तुझ्यासाठी सारखेच आहे!" त्याचा शेजारी म्हणाला.



# खीर

एका श्रीमंत व्यापाऱ्याने मेजवानी ठेवली. मुल्ला नासिरुद्दीनला सुद्धा आमंत्रण होते. मेजवानीमध्ये सर्वांना वाट्यांमधून खीर देण्यात आली. खीर खायला सर्वांना अगदी छोटे चमचे दिले होते. फक्त व्यापाऱ्यासाठी मोठा चमचा होता.

प्रत्येक घास घेताना व्यापारी जिभल्या चाटत म्हणे, "वाह वाह! इतक्या चविष्ट खिरीवर तर कोणीही जीव ओवाळून टाकेल!"

लहान चमच्यांमुळे इतरांना खिरीची धड चवसुद्धा घेता येत नव्हती.

मुल्ला वैतागला. "साहेब, जरा मोठा चमचा देता का? आम्हालाही खिरीवर आमचा जीव ओवाळून टाकायचा आहे!" तो म्हणाला.



A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

मराठी - मानसी महाजन

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# गुप्त खजिना

खूप जुनी गोष्ट आहे. एक होता शेतकरी. त्याला तीन मुलगे होते. तिघेही खूप आळशी होते.

दिवसभर फक्त खाणे आणि झोपणे एवढेच त्यांना ठाऊक होते.



एकदा शेतकरी आजारी पडला. त्याने मुलांना उशाशी बोलावले. "मुलांनो, मी आपल्या शेतात धनाने भरलेली पेटी कुठेतरी पुरून ठेवली आहे, पण कुठे ते आठवत नाही." तो उद्गारला.

वडिलांच्या निष्काळजीपणावर वैतागलेल्या मुलांनी अख्खे शेत खणून काढले.



त्यांना काहीच धन सापडले नाही आणि त्यांनी तसे वडिलांना सांगितले. ते हसून म्हणाले, "बरे, आत्ता नाही तर लवकरच सापडेल."

शेत अनायसे नांगरले आहेच, तर आता पेरणी सुद्‌धा करावी असा मुलांनी विचार केला.



शेतात लवकरच भरभरून पीक आले आणि मुलांना पीक विकून खूप पैसे मिळाले. वडिलांनी मुलांना हाच शेतातील खजिना असल्याचे सांगितले!



मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam
12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# भूत

मुल्ला नसीरुद्दीनकडे एकदा एक माणूस सल्ला विचारण्यासाठी आला.



"मला रोज स्वप्न पडते, की माझ्या पलंगाखाली भूत आहे. पण मी उठून बघतो तर काहीच नसते. त्यांनतर मला अजिबात झोप लागत नाही." तो उदासपणे म्हणाला.

"तुझी समस्या सोडवण्यासाठी तू काय प्रयत्न केलास?" मुल्ला ने विचारले.

"मी वैद्याकडे गेलो." त्याने उत्तर दिले.

"मग वैद्य काय म्हणाला?"मुल्लाने विचारले.

"त्याने इलाज करण्याचे शंभर दिनार मागितले." माणसाने सांगितले.

"शंभर दिनार! एवढ्या छोट्या समस्येचे! त्यापेक्षा मला पाच दिनार दे, मी तुला बरे करतो. " मुल्ला म्हणाला.

त्या माणसाने लगेच पाच दिनार मुलासमोर ठेवले आणि म्हणाला, "हे घ्या, सांगा उपाय. "

मुलाने त्या माणसाच्या बिछान्याचे पाय कापून टाकले. "आता भूत पलंगाखाली जाऊच शकणार नाही!" तो म्हणाला.





# म्हाताऱ्याची शेती होती

म्हाताऱ्याची शेती होती
शेतीमध्ये बदके होती
क्वॅक क्वॅक क्वॅक क्वॅक करत होती
इकडे क्वॅक क्वॅक
तिकडे क्वॅक क्वॅक
इकडे तिकडे क्वॅक क्वॅक



म्हाताऱ्याची शेती होती
शेतीमध्ये डुकरे होती
फुर्र फुर्र फुर्र फुर्र करत होती
इकडे फुर्र फुर्र
तिकडे फुर्र फुर्र
इकडे तिकडे फुर्र फुर्र







म्हाताऱ्याची शेती होती
शेतीमध्ये गाय होती
हम्मा हम्मा करत होती
इकडे हम्मा
तिकडे हम्मा
इकडे तिकडे हम्मा

म्हाताऱ्याची शेती होती
म्हाताऱ्याची शेती होती
म्हाताऱ्याची शेती होती हो!

मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions



# हौदाचा मृत्यू

ताताचारी आणि रामलिंगाडू शेजारी होते. ताताचारी स्वभावाने खूप चिक्कू आणि हावरट होता.

एक दिवस रामलिंगडूला एका छोट्या हौदाची गरज पडली. ताताचारीकडे हौद असेल तर घेऊन यावा म्हणून तो ताताचारीच्या घरी गेला.

"दिवसाला दोन रुपये असे हौदाचे भाडे द्यावे लागेल. ठीक आहे ना?" ताताचारीने विचारले. बिचाऱ्या रामलिंगडूला ही अट मान्य करावी लागली.

चार दिवसांनी रामलिंगाडू हौद परत करण्यासाठी आला. त्याच्या हातात एक लहानसा चंबू सुद्धा होता. "तुमच्या हौदाने या चम्बूला जन्म दिला. घ्या!" चंबू ताताचारीला देत तो म्हणाला.

ताताचारीने आनंदाने चंबू घेतला आणि काही न बोलता घरात निघून गेला.




काही दिवसांनी रामलिंगाडू एका आठवड्यासाठी ताताचारीचा हौद घेऊन गेला.

बरोबर एका आठवड्याने तो रिकाम्या हाताने ताताचारीकडे गेला आणि चेहेरा पाडून म्हणाला, "ताताचारी, तुमचा हौद मृत्यू पावला."

"हौद कसा मरू शकतो? ही तर फसवणूक आहे!" ताताचारी चिडून ओरडला.



"हौद जर चंबूला जन्म देऊ शकतो, तर मरु का नाही शकत?" रामलिंगडूने विचारले. ताताचारी यावर काहीच उत्तर देऊ शकला नाही!

मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# हत्ती आणि कुत्रा



एक होता राजा. त्याच्याकडे एक हत्ती होता. हत्तीची देखभाल एक माहूत करत असे.

माहुताचा एक पाळीव कुत्रा होता. कुत्रा नेहेमी माहुताबरोबर सगळीकडे जात असे.





हत्ती आणि कुत्रा एकत्र जेवत, खेळत. त्यांची अगदी घट्ट मैत्री झाली होती. हत्ती रोज कुत्र्याची वाट पाहत असे.

एकदा माहुताला पैश्यांची खूप निकड होती. त्याने कुत्रा एका श्रीमंत व्यापाऱ्याला विकला. कुत्र्याला खूप वाईट वाटले, पण आता नवीन मालकाबरोबर जाणे भाग होते.

हत्तीला कुत्र्याची खूप आठवण येत होती. त्याने अन्न पाणी सोडले. कोणलाही त्याचे कारण समजत नव्हते.

वैद्यांनी हत्तीला तपासले. "हत्तीला कोणताही रोग झालेला नाही. त्याला कोणाचीतरी आठवण येते आहे. " वैद्यांनी सांगितले.





"त्याचा खेळगडी, कुत्रा कुठे आहे? त्याला लगेच आणा!" राजाने फर्मान सोडले.

राजाची आज्ञा ऐकून श्रीमंत व्यापाऱ्याने लगेच कुत्र्याला सोडून दिले. कुत्रा ताबडतोब हत्तीकडे धावत गेला.

एकमेकांना बघून दोघांना खूप आनंद झाला, आणि ते आनंदाने नाचू लागले.

मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# सप, झुईं, धडाम

भोपळ्याची वेल कौलारू छतापर्यंत पोहोचली.

तरारली, खूप भक्कम झाली. लवकरच त्यावर अनेक भोपळे दिसू लागले.

त्या कौलांमध्ये एका उंदराने घर केले होते, आणि तो तिथे आनंदाने राहायचा.



घराभोवती हिरवेगार गावात उगवले होते. शेळी गवत खाण्यासाठी तिथे आली. तेवढ्यात उंदराने एका भोपळ्याचा देठ दाताने कापला...'सप’.

भोपळा घरंगळत,
'झुईं' करून घसरत
बरोबर शेळीवर
जाऊन
पडला...'धडाम'!
शेळी ओरडू
लागली.

तेव्हांपासून 'सप,
झुईं, धडाम' अशी
म्हणच पडली आहे!



# गाढव आणि सिंह

एके दिवशी सिंह गाढवाला शिकारीला बरोबर घेऊन गेला.

"गाढव दादा, तुमचा आवाज किती बुलंद आहे! तुम्ही जमेल तेवढ्या जोरात रेका. तुमचा आवाज ऐकून सैरावैरा पाळणाऱ्या प्राण्यांची मी शिकार करेन." सिंह म्हणाला.

गाढवाने तसेच केले.



गाढव ओरडू लागताच प्राणी गोंधळून सैरावैरा धावू लागले.

सिंहाने प्राण्यांची शिकार केली. "फार उत्तम रेकतोस तू!" सिंहाने गाढवाची प्रशंसा केली.

तेव्हांपासून गाढवे इतरांकडून आपली प्रशंसा ऐकण्यासाठी रेकू लागली.

मराठी - मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions



# नाव विसरलेली माशी



सणासुदीच्या दिवशी एक माशी भिंतीवर शेण सारवत होती. काम करता करता ती तिचे नावाचं विसरली!

"माझं नाव काय?" ती भांबावून सर्वांना विचारात फिरू लागली.

तिला झाडाखाली बसलेली पेदारासी पेडम्मा दिसली.

तिने विचारले, "पेदारासी पेडम्मा, पेदारासी पेडम्मा, माझे नाव काय?"

"मला नाही माहित. जा माझ्या मुलाला विचार." पेडम्मा म्हणाली. मग माशी गेली पेडम्माच्या मुलाकडे.

"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला माझे नाव काय?" तिने विचारले.

"मला नाही माहित. जा माझ्या हातातल्या कुऱ्हाडीला विचार." तो म्हणाला.





मग माशी गेली कुऱ्हाडीकडे आणि म्हणाली, "पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, माझे नाव काय?"

"मला नाही माहित. जा, मी जे झाड तोडले त्या झाडाला विचार." कुऱ्हाड म्हणाली.

माशी गेली झाडाजवळ. "पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, माझे नाव काय?"

"मला नाही माहित. जा, माझ्या फांद्यांवर बसलेल्या पक्षाला विचार." झाड म्हणाले.

मग माशी गेली फांद्यांवर बसलेल्या पक्षाकडे.



"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, माझे नाव काय?" तिने विचारले.

"मला नाही माहित. मी जिथे पाणी पितो त्या तळ्याला विचार." पक्षी म्हणाला.



"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, पक्षी जिथे पाणी पितो त्या तळ्या, माझे नाव काय?" तिने विचारले.

"मला नाही माहित. माझ्यात पोहणाऱ्या माशाला विचार." तळे म्हणाले.

"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, पक्षी जिथे पाणी पितो त्या तळ्या, तळ्यातल्या माशा, माझे नाव काय?"

"मला नाही माहित. मला पकडू पाहणाऱ्या मुलाला विचार." मासा म्हणाला.

"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, पक्षी जिथे पाणी पितो त्या तळ्या, तळ्यातल्या माशा, मासा पकडणाऱ्या मुला, माझे नाव काय?"



"मला नाही माहित. मी चालवतो त्या घोड्याला विचार." मुलगा म्हणाला.



"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, पक्षी जिथे पाणी पितो त्या तळ्या, तळ्यातल्या माशा, मासा पकडणाऱ्या मुला, मुलाच्या घोड्या, माझे नाव काय?"

"मला नाही माहित. माझ्या पोटातल्या बाळाला विचार." घोडा म्हणाला.

"पेदारासी पेडम्मा, पेडम्माच्या मुला, मुलाच्या कुऱ्हाडी, कुऱ्हाडीने कापलेल्या झाडा, झाडावरच्या पक्षा, पक्षी जिथे पाणी पितो त्या तळ्या, तळ्यातल्या माशा, मासा पकडणाऱ्या मुला, मुलाच्या घोड्या, घोड्याच्या पोटातल्या बाळा, माझे नाव काय?"



"तुझं नाव...तुझं नाव...तुझं नाव...

म...म...मा..." बाळ बोबडं बोलू लागलं.

"अरे खरंच की! माझे नाव माशी!" आणि माशी आनंदाने घरी निघून गेली.

मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# निसर्गाची किमया



दुपारचे ऊन तापले होते.

बदामाच्या झाडाखाली एक शेतकरी विसावला. त्याच्या समोर कलिंगडाचा वेल होता. वेलीवर मोठी मोठी कलिंगडे लागलेली त्याला दिसली. तसेच बदामाच्या झाडावर छोटे छोटे बदाम लागलेले दिसले.



"एवढ्या नाजूक वेलाला एवढी मोठी कलिंगडे, आणि एवढ्या मोठ्या झाडाला एवढी लहान फळे!" त्याला नवल वाटले.

तेवढ्यात त्याच्या डोक्यात एक बदाम पडला.

"जर बदामाचे फळ कलिंगडाएवढे मोठे असते, तर आत्ता माझे काय झाले असते! खरे आहे, निसर्गाची किमया काही औरच आहे!" त्याने खुशीत विचार केला.



## करून पहा

मुल्ला नासिरूद्‌दिन काही डागडुजी करण्यासाठी छतावर चढले आणि अचानक चक्कर येऊन खाली पडले.

शेजारी पाजारी गोळा झाले.

"काय झाले मुल्ला?" एकाने विचारले. "मुल्ला, भोवळ आली का?" दुसरा म्हणाला. "आता कसे वाटते आहे?" अजून एकाने विचारले.

"तुमच्या प्रश्नांनी माझा जीव घेऊ नका. वर चढा आणि माझ्यासारखे खाली पडा, सगळी उत्तरे मिळतील आपोआप," मुलाने उत्तर दिले.



मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# माझे कुटुंब



माझे नाव कल्पना.
मी सात वर्षांची आहे.
मी शाळेत जाते.
मी दुसऱ्या इयत्तेत शिकते.

मला गाणी गायला आवडतात.
मी खूप खेळ खेळते.
मला चित्रे काढायला खूप
आवडतात.

माझ्या धाकट्या भावाचे नाव आहे विनोद.

तो चार वर्षांचा आहे. तो सतत खेळत असतो. तो खूप गोड़ बोलतो. त्याला माझ्याबरोबर शाळेत यावेसे वाटते.

उन्हाळ्याच्या सुट्टीनंतर विनोद सुद्धा शाळेत जाणार आहे. मग आम्ही दोघे मिळून शाळेला जाऊ.





माझ्या वडिलांचे नाव आहे रंगा राव. सगळे त्यांना रंगा म्हणतात.

मी कधीकधी त्यांच्या बरोबर शेतात जाते. ते मला वेगवेगळे पक्षी, किडे, फुले, फळे दाखवतात.

माझ्या आईचे नाव आहे सुशीलम्मा. ती मला गाणी शिकवते. मला आणि माझ्या भावाला भरवते.

माझे आई आणि वडील शेतात काम करतात. ते शेतात पिके काढतात.

आमच्या गोठ्यात गायी आणि म्हशी आहेत.

वासरे इकडे तिकडे बागडत असतात. माझा भाऊ आणि मी त्यांना चारा घालतो.

त्यांच्या मानेभोवती घंटा बांधतो. आम्हाला त्या घंटेचा मंजूळ आवाज खूप आवडतो.



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कोल्हा आणि करकोचा

कोल्हा आणि करकोचा मित्र होते.

"मित्रा, माझ्या घरी जेवायला ये." असे म्हणून कोल्ह्याने करकोच्याला घरी जेवायला बोलावले.



कोल्ह्याने खीर केली आणि बशीत वाढून करकोच्यासमोर ठेवली. करकोच्याने आपल्या लांब चोचीने बशीतून खीर खायचा खूप प्रयत्न केला, पण त्याला एकही घास घेता आला नाही.

कोल्ह्याने बशीतली खीर चाटून पुसून खाल्ली. "मित्रा, अरे असे खायचे असते." असे म्हणत त्याने सगळी खीर खाऊन टाकली. "रागावू नकोस मित्रा, जेवायला दुसरे काहीच केलेले नाही." कोल्हा म्हणाला.

"ठीक आहे मित्रा. पण आता तू लवकरच माझ्या घरी जेवायला आले पाहिजेस." करकोचा म्हणाला.



काही दिवसांनी कोल्हा करकोच्याच्या घरी जेवायला गेला. करकोच्याने माशाचे कालवण करून एका अरुंद तोंडाच्या भांडयात वाढले.

कोल्हा भांड्याभोवती गोल गोल फिरला. भांडे चाटून, हुंगून पहिले. भांड्याच्या अरुंद तोंडात कोल्ह्याचे तोंड जाईना. त्याला एकही घास खाता आला नाही.

"अरे मित्रा, हे बघ असे खायचे असते." असे म्हणत करकोच्याने आपली लांब चोच भांड्यात घातली आणि सगळे कालवण खाऊन टाकले. "रागावू नकोस, पण घरात जेवायला दुसरे काहीच नाही."

कोल्हा संतापला. मेजवानीच्या आशेने आलेला कोल्हा भुकेलाच परत निघाला. तेव्हापासून कोल्हा आणि करकोचा यांची मैत्री तुटली, ती कायमची.



# टाळ्या वाजवा



टाळ्या वाजवा, टाळ्या वाजवा, जोरात टाळ्या वाजवा
गाणे ऐका, गाणे ऐका, जोरात टाळ्या वाजवा.

पाय नाचवा, पाय नाचवा, तालात पाय नाचवा
गाणे ऐका, गाणे ऐका, तालात पाय नाचवा.



गोल फिरा, गोल फिरा, गरगर गोल फिरा
गाणे ऐका, गाणे ऐका, गरगर गोल फिरा.

उड्या मारा उड्या मारा उंच उड्या मारा
गाणे ऐका, गाणे ऐका, उंच उड्या मारा.

टाळ्या वाजवा, टाळ्या वाजवा, जोरात टाळ्या वाजवा
गाणे ऐका, गाणे ऐका, जोरात टाळ्या वाजवा.

मराठी - मानसी महाजन





**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# मुळा

एका आजोबांनी शेतात मुळा लावला. मूळ्याचे रोप वाढले, खूप मोठे झाले. मुळा काढण्यासाठी शेतकरी रोप मातीतून उपसू लागला, पण रोप काही बाहेर येईना. त्याने आजीला हाक मारली.



आजीने आजोबांना पकडले, आजोबांनी मुळ्याच्या रोपाला आणि दोघे मिळून ओढू लागले, ओढू लागले. तरीही मुळा काही बाहेर येईना. मग आजीने नातीला बोलावले.

नातीने आजीला पकडले, आजीने आजोबांना, आणि आजोबांनी मुळ्याच्या रोपाला. तिघे मिळून ओढू लागले, ओढू लागले. तरीही मुळा काही बाहेर येईना. मग नातीने कुत्र्याला बोलावले.



कुत्र्याने नातीला पकडले, नातीने आजीला , आजीने आजोबांना, आणि आजोबांनी मुळ्याच्या रोपाला. चौघे मिळून ओढू लागले, ओढू लागले. तरीही मुळा काही बाहेर येईना. मग कुत्र्याने मांजरीला बोलावले.

मांजरीने कुत्र्याला पकडले, कुत्र्याने नातीला, नातीने आजीला, आजीने आजोबांना, आणि आजोबांनी मुळ्याच्या रोपाला. सगळे मिळून ओढू लागले, ओढू लागले. तरीही मुळा काही बाहेर येईना. मग मांजरीने उंदराला बोलावले.

उंदराने मांजरीला पकडले, मांजरीने कुत्र्याला, कुत्र्याने नातीला, नातीने आजीला, आजीने आजोबांना, आणि आजोबांनी मुळ्याच्या रोपाला. सगळे मिळून ओढू लागले, ओढू लागले. शेवटी एकदाचा मुळा बाहेर आला!



# तहानलेला कावळा



कावळ्याला तहान
लागली. त्याला एक पाणी
असलेला माठ दिसला.



पण पाणी अगदी
तळाशी होते.
तिथे पोहोचणार कसे?



तेवढ्यात कावळ्याला जवळच
पडलेले काही दगड दिसले.
त्याने चोचीने उचलून एक एक
करत सर्व दगड मठात टाकले.



दगड माठात खाली
पडले तसे पाणी वर
वर येऊ लागले.
कावळा मनसोक्त
पाणी प्यायला आणि
उडून गेला.



**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

मराठी - मानसी महाजन



12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17. e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# खोडकर मूल



एक दिवस बिरबलला दरबारात यायला खूप उशीर झाला. महाराज अकबरने त्याबद्दल विचारता बिरबल म्हणाला, "महाराज, मी माझ्या मुलाला शांत करत होतो."

"त्यात काय एवढे अवघड?" अकबरने विचारले.

"महाराज, आपण प्रत्यक्ष अनुभव घेऊन बघा. थोडा वेळ तुम्ही माझे वडील आहात असे नाटक करू." बिरबलने सुचवले. अकबर तयार झाला.





बिरबल झाला लहान मुलगा, आणि अकबर त्याचे बाबा.

बिरबलने पिशवी मागितली, मग खाऊ मागितला, खेळायला खेळणी मागितली. अकबरने त्याच्या नोकरांना सगळं आणून द्यायला लावलं.

मग बिरबलने खरा हत्ती मागितला. अकबरने नोकरांना तो सुद्धा आणायला सांगितला.

"हा हत्ती या पिशवीत घाला." बिरबलने फर्मावले. अकबर खेळण्यातला हत्ती पिशवीत घालणार तोच बिरबल ओरडला. "नाही नाही तो नाही! खरा हत्ती पिशवीत घाला." आणि बिरबल चक्क रडू लागला.



अकबरने बिरबल पुढे हात टेकले. "बरोबर आहे तुझे. मुलांना समजावणे खरंच फार अवघड काम आहे!" त्याने मान्य केले.

मराठी - मानसी महाजन



A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani, Printed at Charita Impressions

# मिठाईचा वास आणि नाण्यांचा खणखणाट



सोमा शर्मा गरीबही होता आणि भोळाही. एकदा तो शहरात गेला असता तिथे त्याला मिठाईचे दुकान दिसले.



दुकानात जिलेबी, पेढे, गुलाबजाम अश्या अनेक मिठाया होत्या. त्या पाहून सोमाच्या तोंडाला पाणी सुटले. मिठाई विकत घेण्याचे पैसे नव्हते, त्यामुळे सोमा लांबूनच मिठायांकडे पाहत उभा राहिला.

दुकानदाराने सोमाला पहिले आणि तो त्याच्यावर खेकसला. "काय रे! इथे आमच्या मिठाईचा वास घेत उभा आहेस, तेही फुकट! चाल पैसे काढ निमूट." हे ऐकून सोमा शर्मा थक्क झाला.



जवळूनच रामण्णा चालला होता. त्याने दुकानदाराचे बोलणे ऐकले. "अगदी योग्य आणि खरे बोललात." रामण्णा दुकानदाराला म्हणाला. "सोमा शर्मा गरीब आहे, त्यामुळे त्याचे देणे मी फेडतो."



दुकानदार आनंदाने तयार झाला. रामण्णाने त्याची नाण्यांची थैली दुकानदारासमोर वाजवली. नाण्यांचा खणखणाट ऐकू आला.

"सोमा शर्माने मिठाईचा वास घेतला म्हणून तो तुझे देणे लागत होता. आता तू माझ्या नाण्यांचा खणखणाट ऐकलास, त्यामुळे ते देणे फिटले." रामण्णाने ठामपणे सांगितले.

दुकानदाराला स्वतःच्या वागण्याची लाज वाटली.



मराठी –
मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# खेडूत उंदीर आणि शहरी उंदीर



एकदा शहरात राहणारा उंदिर खेड्यात राहणाऱ्या उंदराला भेटायला गेला. खेडूत उंदराने त्यांच्याकडचे गहू, हरभरा, तांदूळ आणि इतर धान्ये शहरी उंदराला खायला दिली.

धान्ये खाऊन शहरी उंदीर म्हणाला, "तुम्ही खेडूत ही धान्ये खाता म्हणून असे हडकुळे असता. शहरात आमच्याकडे अनेक पक्वान्न असतात." असे म्हणून त्याने खेडूत उंदराला शहरात येण्याचे आमंत्रण दिले.



त्यानुसार एक दिवस खेडूत उंदीर शहरी उंदराला भेटायला शहरात गेला.

स्वयंपाकघरात खिरीचा वाडगा ठेवलेला होता. दोघे उंदीर खीर खाणार तेवढ्यात त्यांच्या अंगावर एक मांजर धावून आली.

दोघे कसेबसे सुटले. दिवसभर दोघे त्यांच्या बिळात लपून राहिले.





रात्र झाली. शहरी उंदराने खेडूत उंदराला हळूच एका घरात नेले. मेजावर अनेक पक्वान्न मांडून ठेवले होते. दोघे मेजावर चढले. खेडूत उंदराने अशी मेजवानी कधीच पाहिली नव्हती.

"तू सांगितलेले खरेच होते रे! अशी मेजवानी मी कधीच पाहिली नव्हती!" खेडूत उंदीर म्हणाला.

तेवढ्यात घरातल्या
माणसाने उंदरांना पाहिले,
आणि त्यांना पळवून
लावले. दोघे उंदीर उघड्या
दारातून कसे बसे सुटले.

"मी शेतात राहत असलो,
मला लोणी, पाव चीझ
अशी पक्वान्ने खायला
मिळत नसली, तरीही मला
सारखे कोणालातरी घाबरून
जगावे लागत नाही." असे
म्हणून खेडूत उंदीर
आपल्या गावी परतला.

मराठी - मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# बेडकांचा राजा



एका तळ्यात अनेक बेडूक राहत होते. खायला भरपूर अन्न होते. बेडूक दिवसभर खेळत, आनंदात राहत. त्यांना कुठलीही भीती किंवा काळजी नव्हती.

एका बेडकाला हे बघवले नाही. त्याला वाटले बेडकांचे काही नियम हवेत आणि त्यांचा एक राजासुद्धा हवा. त्याने इतर बेडकांना आपले विचार सांगितले. सर्वांना त्याचे म्हणणे पटले.





"देवा! आमच्यावर राज्य करण्यासाठी एक राजा पाठव!" त्यांनी प्रार्थना सुरु केली.

तेवढ्यात लाकडाचा एक मोठा ओंडका धपकन तळ्यात पडला. बेडूक घाबरले. सगळ्यांनी तळ्याबाहेर उड्या घेतल्या आणि काठावरून पाण्यात डोकावून पाहू लागले.

पाणी शांत झाले तसे बेडकांना पाण्यावर तरंगणारा ओंडका दिसला. देवांनी आपली प्रार्थना ऐकून आपल्यासाठी हाच राजा पाठवला आहे अशी त्यांची समजूत झाली. दोन शूर बेडूक पाण्यात उडी मारून ओंडक्याजवळ गेले. त्यांनी ओंडक्याला हळूच ढकलून पहिले. ओंडका काही हलेना. मग त्यांनी ओंडक्यावर चढून पाण्यात उड्या मारल्या. हळू हळू इतर बेडकांची भीड चेपली आणि सगळेच बेडूक ओंडक्यावरून उड्या मारू लागले.

असेच काही दिवस गेले. आता बेडूक ओंडक्याकडे दुर्लक्ष करू लागले. हा न बोलणारा, न हलणारा राजा त्यांना काही आवडला नव्हता. "आम्हाला खरा राजा हवा, आमच्यावर राज्य करू शकेल असा राजा." त्यांनी पुन्हा प्रार्थना सुरु केली.

तेवढ्यात तळ्याजवळ एक बगळा येऊन बसला. "हाच आपला नवीन राजा. आपले म्हणणे ऐकून घेईल असा राजा! बोलू शकेल असा राजा!" बेडूक आनंदाने उड्या मारू लागले.

लवकरच, तळ्यातील बेडकांची संख्या कमी कमी होऊ लागली. बेडकांना समजले की आधीचा न बोलणारा राजाच खरे तर जास्त चांगला राजा होता!



# चिंकीची मेंढी



चिंकीची एक छोटी मेंढी
छोटी मेंढी छोटी मेंढी
चिंकीची एक छोटी मेंढी
गोरी गोरी पान.

चिंकीमागे तुरुतुरु जाई
तुरुतुरु जाई तुरुतुरु जाई
चिंकीमागे तुरुतुरु जाई
मेंढी हलवीत कान.

चिंकीसोबत शाळेत गेली
शाळेत गेली शाळेत गेली
चिंकीसोबत शाळेत गेली
मेंढी एके दिवशी.

हसू बागडू मुले लागली
मुले लागली मुले लागली
हसू बागडू मुले लागली
गम्मत झाली खाशी.




मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614. Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# कुत्रे मांजरींचा आणि मांजरी उंदरांचा पाठलाग का करतात?

खूप खूप वर्षांपूर्वी कुत्रा, मांजर आणि उंदीर मित्र होते. त्यांना कायम एकमेकांबरोबर राहावे असे मनापासून वाटत. इतके, की त्यांनी कागदावर असा एक करारच लिहून ठेवला!

कुत्रा बाहेरची सगळी कामे करी, उंदीर आणि मांजर घरातली कामे करत.

मांजरीने त्यांचा कराराचा कागद माळ्यावर व्यवस्थित जपून ठेवला.



काही दिवसांनी कुत्र्याला बाहेरची कामे करून खूप वैताग आला.



"तू आणि उंदीर घरात सुखरूप आणि आरामात बसता, आणि मला तिथे उन्हात रापत, पावसात भिजत, थंडीवाऱ्यात कुडकुडत पहारा द्यावा लागतो." तो चिडून मांजरीला म्हणाला.

मांजर म्हणाली, "आपण केलेला करार तुला आठवत नाही का?"

"कुठे आहे तो कागद? मला पाहायचा आहे, जा घेऊन ये." कुत्रा गुरगुरला.

मांजर कागद आणायला माळ्यावर चढून गेली. तिने पाहिले तर उंदीर कागद कुरतडून, त्याची गादी करून त्यावर झोपला होता!



मांजर संतापली आणि
उंदरामागे धावू लागली,
पण त्याला पकडू शकली
नाही.

शेवटी दमून भागून परत खाली
आली.

"करार कुठे आहे?" कुत्र्याने विचारले. मांजरीकडे करार नाही
हे बघता कुत्रा चिडून मांजरीमागे धावू लागला.

तेव्हांपासून असे म्हणतात, की कुत्र्यांना मांजर दिसली रे
दिसली, की करार पाहण्यासाठी ते त्यांचा पाठलाग करू
लागतात.

उंदराने केलेला घोटाळा आठवला की मांजरी उंदरांचा
पाठलाग करू लागतात.

आता समजले ना, मांजरी उंदरांचा आणि कुत्रे मांजरीचा
पाठलाग का करतात?

# कुठे गेलात?

अंगठे दादा अंगठे दादा, कुठे गेलात?
आलो आलो आलो आलो, धावत येतो.
अंगठे दादा अंगठे दादा, कसे आहात?
बरा आहे, बरा आहे, आता घरी जातो.

तर्जनी ताई, तर्जनी ताई कुठे गेलीस?
आले आले आले आले, धावत येते.
तर्जनी ताई, तर्जनी ताई, कशी आहेस?
बरी आहे, बरी आहे, आता घरी जाते.

मध्यमा काकू, मध्यमा काकू कुठे गेलात?
आले आले आले आले, धावत येते.
मध्यमा काकू, मध्यमा काकू, कशा आहात?
बरी आहे, बरी आहे, आता घरी जाते.

अनामिका, अनामिका कुठे गेलीस?
आले आले आले आले, धावत येते.
अनामिका, अनामिका, कशी आहेस?
बरी आहे, बरी आहे, आता घरी जाते.

करंगळी, करंगळी कुठे गेलीस?
आले आले आले आले, धावत येते.
करंगळी, करंगळी, कशी आहेस?
बरी आहे, बरी आहे, आता घरी जाते.



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# वटवाघूळ

खूप वर्षांपूर्वी, प्राणी आणि पक्षी यांचे भांडण सुरु झाले.

वटवाघुळाने कोणाचीच बाजू घेतली नाही. कोणती बाजू जिंकते आहे हे ते पाहू लागले.





आधी असे वाटले की पक्षी भांडणात जिंकणार. वटवाघूळ पक्षांच्या गोटात शामिल झाले आणि आपण पक्षीच आहोत असे सांगू लागले. आपले पंख पसरून उडून दाखवून आपण पक्षी आहोत हे सिद्‌ध करू लागले.

परंतु थोड्याच दिवसात प्राणी जिंकतील असे दिसू लागले. मग वटवाघूळ प्राण्यांच्या गोटात गेले. आपले सुळे दाखवून आपण प्राणीच आहोत आणि आपल्याला प्राणीच आवडतात असे सांगू लागले.





भांडणात शेवटी पक्षांचा विजय झाला. वटवाघूळ पुन्हा पक्षांकडे गेले. पण या वेळी मात्र पक्षांनी त्याला हाकलून लावले.

मग वटवाघूळ पुन्हा प्राण्यांकडे गेले. पण प्राण्यांनी सुद्धा त्याला हाकलून लावले.

तेव्हापासून वटवाघूळ अंधाऱ्या खोल्यांमध्ये, झाडाच्या बुंध्यांमध्ये राहू लागले. प्राणी आणि पक्षी यांच्यापासून तोंड लपवत रात्रीचेच उडू लागले.

# न बदलणारे उत्तर



"होजा, तुझे वय काय?" एकाने विचारले.

"चाळीस वर्षे!" होजा उत्तरला.

"कसे शक्य आहे? दहा वर्षांपूर्वीसुद्धा तू तुझे वय चाळीसच सांगितले होतेस."

"एकदा सांगितलेले वचन बदलणारा माणूस वाटलो की काय मी तुला? अजून वीस वर्षांनी विचारलेस तरीही माझे उत्तर तेच असेल!" होजा ठणकावून म्हणाला.

मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# हरवलेली अंगठी





एकदा संध्याकाळी मुल्लाच्या बोटातली अंगठी खाली पडली. अंगठी  पडल्याचा आवाज ऐकू आला.

तेवढ्यात दिवा विझला. अंधारात अंगठी शोधता येईना म्हणून मुल्ला घराबाहेर आला.

पौर्णिमेचा पूर्ण चंद्र होता. त्याच्या प्रकाशात मुल्ला अंगठी शोधू लागला.

"मुल्ला! काय शोधताय?" एका वाटसरूने विचारले.

"माझी अंगठी पडली, ती शोधतोय." मुल्ला म्हणाला.

"कुठे पडली?" मुल्लाला अंगठी शोधायला मदत व्हावी म्हणून वाटसरूने विचारले.

"घरात पडली." मुल्ला म्हणाला.

"मग इथे बाहेर का शोधताय?" वाटसरूने विचारले.

"घरात अंधार आहे, त्यामुळे इथे उजेडात शोधतो आहे!" मुल्लाने सांगितले.



# हरीण

एक हरीण पाणी पिण्यासाठी झऱ्याजवळ गेले. पाण्यात त्याला स्वतःचे प्रतिबिंब दिसले. प्रतिबिंबात दिसणारी शिंगे त्याला फारच आवडली. तेवढ्यात त्याला स्वतःचे पाय दिसले. ते मात्र त्याला अजिबात आवडले नाहीत. "नुसत्या कड्यांसारखे दिसत आहेत माझे पाय" त्याला वाटले.



एके दिवशी सिंहाने हरिणाचा पाठलाग केला. हरीण गवतातून जोरात धावू लागले. परंतु जंगलातील दाट झाडांच्या फांद्यांमध्ये त्याची शिंगे अडकू लागली. खूप प्रयत्न करून एकदाची त्याने शिंगे सोडवली, आणि सिंहापासून लांब पळाला.

"मला जे पाय काठ्यांसारखे कुरूप वाटले, त्यांच्यामुळेच मी जोरात धावत सिंहापासून वाचू शकलो. ज्या शिंगांचे मला कौतुक वाटले त्यांनी मात्र माझा घात केला असता." त्याने विचार केला.



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614; Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# न संपणारी गोष्ट



एक होता राजा. त्याला गोष्टी ऐकायला खूप आवडत असे. उत्तम गोष्टी सांगणाऱ्यांना तो भरघोस इनाम देत असे.

त्याचे हे गोष्ट-वेड मंत्र्यांना मात्र अडचणीचे ठरत होते. एका मंत्र्याने त्यावर इलाज करण्याचे ठरवले. जो कोणी राजाला कधीही न संपणारी गोष्ट सांगेल त्याला खूप मोठे बक्षीस मिळेल अशी त्याने दवंडी पिटली. अनेक लोक पुढे आले, पण सर्वांच्या गोष्टींना शेवट होताच. बक्षीस कोणालाही मिळाले नाही.





एके दिवशी एक माणूस राजाकडे आला आणि न संपणारी गोष्ट सांगू शकतो असे म्हणाला. राजाने त्याला ताबडतोब गोष्ट सुरु करण्याची आज्ञा दिली.

"जरूर!" तो माणूस म्हणाला. "पण माझी एक अट आहे महाराज. गोष्ट ऐकताना तुम्ही आणि मग...आणि मग...असे न कंटाळता म्हणत राहिले पाहिजे." राजाने ही अट मान्य केली.

"एक होता पक्षी. त्याला भूक लागली होती म्हणून तो अन्न शोधत होता."

"आणि मग..."

"त्याला एक धान्याने भरलेली कणगी दिसली. पक्षाने कणगीला चोचीने भोक पाडले.

"आणि मग..."

"पक्षाने एक दाणा चोचीत घेतला आणि उडत घरट्याकडे गेला."

"आणि मग..."

"पक्षी परत आला, चोचीत अजून एक दाणा घेऊन घरट्याकडे उडत गेला."

"आणि मग..."



"पक्षी परत आला, चोचीत अजून एक दाणा घेऊन घरट्याकडे उडत गेला."

"पुढे काय झाले?" राजाने अधीरपणे विचारले.

"पक्षी परत आला, चोचीत अजून एक दाणा घेऊन घरट्याकडे उडत गेला."

राजाला राग आला. "किती वेळा असे दाणा घेऊन उडणार आहे पक्षी? त्यानंतर काय झाले?"

"महाराज! कणगी रिकामी तर व्हायला हवी!" माणूस म्हणाला.





"अरे देवा! ही खरेच शेवट नसलेली गोष्ट आहे. आता बास कर! तुझे बक्षीस घे आणि निघ." राजा वैतागून म्हणला.

त्यानंतर राजाने कधीही गोष्ट ऐकायचा हट्ट केला नाही.

मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# जगावेगळी मैत्री

एका उंदराने सिंहाच्या गुहेखाली आपले बीळ खोदले. त्याला वाटले आपण सिंहाच्या गुहेत सुरक्षित राहू.

पण उंदीर शांत कसा बसेल? सिंह झोपला की उंदीर त्याच्या अंगावरून उड्या मारे. सिंहाने त्याला पकडण्याचा प्रयत्न केला, की पटकन बिळात लपे.



शेवटी उंदराचे हे चाळे सहन न होऊन सिंहाने मांजरीला गुहेत आणले.

"तुला हवे तेवढे अन्न देतो. पण या उंदराचा काहीतरी बंदोबस्त कर." त्याने मांजरीला सांगितले.

आता उंदीर सावध झाला.



एक दिवस सिंह गुहेत नसताना मांजरीने उंदराला पकडले. ती त्याला खाणार एवढ्यात उंदीर म्हणाला, "थांब! तू मला खाल्लेस तर सिंह तुला गुहेतून हाकलून लावेल. तू मला मोकळे सोडलेस तर आपण दोघेही सुखात राहू शकू." त्याने सल्ला दिला.

"खरे बोलतो आहेस!", मांजर म्हणाली आणि तिने उंदराला सोडून दिले. सिंह गुहेत नसताना दोघे एकमेकांशी खेळू लागले.





सिंह गुहेत असताना मात्र मांजर उंदराला पकडण्याचे नाटक करत असे. उंदीरही घाबरल्याचे नाटक करून पळत जाऊन बिळात लपे.

उंदीर आणि मांजराची मैत्री अशीच सुरु राहिली. सिंहाला वाटे की मांजरीमुळे उंदीर त्याला त्रास देत नाही, आणि तो खुश होता.

मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# ओळखा कोण?



एक खार आणि एक ससा जिवलग मित्र होते. खारीला सर्व गोष्टींचे कुतूहल असे आणि ती कायम नवीन काही शिकण्यासाठी तयार असे. ससा खूप हुशार होता आणि कायम कोड्यांमध्ये बोलायचा.

खार: एवढ्या सकाळी सकाळी कुठे निघालास?

ससा: माझ्या नवीन मित्राशी खेळायला निघालो.

खार: नवा मित्र? कोण बरे?

ससा: ओळख पाहू! त्याला चार पाय आहेत.

खार: आपल्याला सर्वांनाच चार पाय आहेत. तुझा मित्र मोठा आहे का?

ससा: हो!





खार: तुझा मित्र आहे हत्ती!

ससा: नाही! माझ्या मित्राला सोंड नाही आहे.

खार: मग तुझा मित्र आहे गेंडा. गेंडा मोठा असतो, आणि त्याला सोंड नसते.

ससा: नाही नाही! माझ्या मित्राला शिंग नाही आहे.

खार: मग तुझा मित्र आहे उंट! त्याला चार पाय असतात, सोंड नसते आणि शिंगही नसते.







ससा: नाही ग! माझ्या मित्राला उंटासारखे कुबड नाही आहे.



खार: बरे. मग वाघ असणार तुझा मित्र. त्याला चार पाय असतात, सोंड आणि शिंग नसते आणि कुबडही नसते.

ससा: माझ्या मित्राला वाघासारखे पट्टे नाहीत.

खार: मग कदाचित अस्वल असेल तुझा मित्र.  त्याला पट्टे नसतात.



ससा: नाही. माझ्या मित्राला अस्वलासारखे केस नाहीत.

खार: थांब! तुझ्या मित्राच्या अंगावर मोठे मोठे ठिपके असतात का?

ससा: हो! असतात!

खार: मग तुझा मित्र आहे हरीण! त्याला चार पाय असतात, सोंड, शिंग, कुबड नसते, पट्टे नसतात केस नसतात आणि अंगावर ठिपके असतात!

ससा: नाही! माझ्या मित्राची मान खूप लांब आहे.

खार: मला समजले! तुझा मित्र म्हणजे जिराफ! त्याला चार पाय असतात, सोंड, शिंग, कुबड, पट्टे आणि केस नसतात, अंगावर मोठे ठिपके असतात आणि लांब मान असते.

ससा: बरोबर ओळखलेस! तू माझ्याबरोबर येऊ शकतेस. आपण दोघे त्याच्या पाठीवर चढून खेळू!



मराठी - मानसी महाजन

A Bagful of Stories

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# नऊ का दहा?



एक व्यापारी त्याच्या दहा उंटांना घेऊन प्रवासाला निघाला. एका उंटावर तो स्वतः बसला होता, आणि बाकीचे नऊ त्यांच्या मागून चालत होते.



थोडे पुढे गेल्यावर त्याला वाटले, सगळे उंट येत आहेत याची खात्री करावी.

व्यापारी मागे पाहत उंट मोजू लागला. "एक दोन, तीन, चार, पाच, सहा, सात आठ, नऊ. अरे! अरे! दहावा उंट कुठे गेला?" व्यापारी विचार करत उंटावरून खाली उतरला.



त्याने सगळीकडे हरवलेला उंट शोधला. उंट काही सापडला नाही. थोड्या वेळानी त्याने पुन्हा सगळे उंट मोजले. "एक, दोन, ...नऊ, दहा" सगळे उंट आहेत हे पाहून त्याला आनंद झाला.

उंटावर बसून तो पुढे निघाला. थोड्या वेळानी त्याला पुन्हा शंका आली आणि सर्व उंट आहेत का हे तइ पाहू लागला. मोजल्यावर पुन्हा नऊच उंट भरले.

व्यापारी उंटावरणु खाली उतरला आणि हरवलेला उंट शोधू लागला. त्याला अर्थातच 'हरवलेला' उंट कुठेही सापडला नाही.

मोजण्यात चूक झाली असावी असे वाटून त्याने पुन्हा एकदा उंट मोजले.

अहो आश्चर्य! दहाच्या दहा उंट होते!



व्यापाऱ्याला काहीच समजेना. ही तर जादू होते आहे!

"मी उंटावर बसलेला असतो तेव्हां नेहेमी एक उंट हरवतो. आणि मी चालत असतो तेव्हां सर्व दहा उंट हजर होतात." त्याने विचार केला.

त्यामुळे पुढची संपूर्ण वाट तापलेल्या उन्हात उंटावर बसून जाण्याच्या ऐवजी उंटांबरोबर चालत जाण्याचे त्याने ठरवले!

मराठी - मानसी महाजन



A Bagful of Stories
Published by
Manchi Pustakam
12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614; Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# काटा दिला चाकू घेतला



एक होते माकड. एकदा त्याच्या पायात काटा घुसला.

तिथून एक न्हावी जात होता. माकडाने न्हाव्याला काटा काढण्याची विनंती केली. न्हाव्याने काटा कसाबसा काढला, पण काढताना काट्याचे दोन तुकडे झाले.

"माझा काटा परत दे, नाहीतर तुझा चाकू मला दे." माकड म्हणाले. बिचाऱ्या न्हाव्याने माकडाला त्याचा चाकू दिला.





पुढे माकडाला एक लाकुडतोड्या भेटला. "मला थोड्या काठ्या कापायच्या आहेत. तुझा चाकू देशील का?" लाकुडतोड्याने विचारले.

"चालेल." माकड म्हणाले आणि त्याने चाकू दिला. काठ्या तोडताना चाकू मोडला. "माझा चाकू मला दे नाहीतर तुझ्या काठ्या मला दे."

माकड म्हणाले. लाकुडतोड्याने सगळ्या काठ्या माकडाला दिल्या.

थोड्या वेळानी माकडाला एक म्हातारी बाई भेटली. तिच्याकडे पोळ्या करण्यासाठी कणिक आणि तेल होते, पण चूल पेटवण्यासाठी लाकडे नव्हती.

"मला थोड्या पोळ्या करायच्या आहेत. तुझ्या काठ्या देशील का?" म्हातारीने विचारले. "चालेल." माकड म्हणाले, आणि त्याने काठ्या दिल्या. पोळ्या करताना काठ्यांची जळून राख झाली.



माकड म्हणाले, "माझ्या काठ्या दे, नाहीतर तुझ्या पोळ्या मला दे." म्हाताऱ्या बाईने नाईलाजाने माकडाला पोळ्या दिल्या.

पुढे माकडाला एक लहान मूल दिसले. ते रडत होते. "माझे बाळ रडते आहे, तुझ्या पोळ्या त्याला देशील का?" बाळाच्या आईने विचारले. माकडाने पोळ्या दिल्या आणि त्या खाऊन बाळ शांत झाले.



माकडाने हट्ट धरला, "माझ्या पोळ्या दे नाहीतर मला तुझे बाळ दे." आईने नाईलाजाने माकडाला बाळ देऊन टाकले.

माकडाला पुढे एक सर्कशीचा तंबू दिसला. एक विदूषक ढोल वाजवत होता. माकडाला ढोल फार आवडला. त्याने विदूषकाचा बाळाच्या बदल्यात ढोल दे असे सुचवले.



विदूषकाचे बाळ घेऊन माकडाला ढोल दिला.

ढोल बडवत माकड गाऊ लागले:

"काटा दिला चाकू घेतला

टम टम टम

चाकू दिला काठ्या घेतल्या

टम टम टम

काठ्या दिल्या पोळ्या घेतल्या

टम टम टम

पोळ्या दिल्या बाळ घेतले

टम टम टम

बाळ दिले ढोल घेतला

टम टम टम

टम टम टम!"



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# नारळ आणि वड



एकदा एका कावळ्याने नारळाच्या झाडावर वडाचे बी टाकले.

वडाचे एवढेसे बी पाहून नारळाचे झाड हसू लागले. "माझी फळे हाताएवढी आणि बिया तर मुठी एवढ्या असतात. तोफेच्या गोळ्यांसारख्या दिसणाऱ्या माझ्या फळांना घाबरून माझ्या छायेला कोणीही उभे राहण्याची हिम्मत करत नाही. तू एवढीशी बी! तुझ्यापासून असे कितीसे मोठे झाड येणार?"





अनेक दिवस झाले. नारळ वडाच्या बीला विसरूनही गेला. बी रुजली आणि त्यातून छोटेसे झाड आले.

नारळ छोट्या वडाला म्हणाला, "तू एवढ्याश्या बी मधून जन्माला आहेस, तू मला काहीही करू शकत नाहीस. मी खूप शक्तिमान आहे."

नारळ अनेकदा असे टोचून बोलत असे, पण वड काहीच उत्तर देत नसे.

हळू हळू वडाचे झाड मोठे मोठे होऊ लागले.

लवकरच ते नारळापेक्षा उंच झाले.



वडाच्या
पारंब्यांमध्ये
अडकून
नारळाचे झाड
सुकून गेले.

# पायाचे ठसे

म्हाताऱ्या सिंहला शिकार करता येत नव्हती. तो एका गुहेत गेला आणि त्याने आजारी असल्याचे नाटक सुरु केले. आजारी सिंहाची विचारपूस करायला अनेक प्राणी येऊ लागले.

गुहेत येणाऱ्या सर्व प्राण्यांना सिंह गुपचूप खात असे.

एके दिवशी कोल्हा सिंहाची विचारपूस करण्यासाठी आला. गुहेच्या दाराशी उभे राहून म्हणाला, "सिंह महाराज, कसे आहेत?"

"खूप आजारी आहे रे", सिंह व्हिवळला. "आत ये ना."

"गुहेत जाणारे अनेक पायांचे ठसे दिसत आहेत, पण बाहेर येणारा एकही नाही. त्यामुळे मी बाहेरच बरा आहे." हुशार कोल्हा म्हणाला.

मराठी - मानसी महाजन



A Bagful of Stories
*Published by*
Manchi Pustakam
12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S Pavani; Printed at Charita Impressions

# सुई



एके दिवशी परमानंदय्याने आपल्या शिष्यांना बोलावले आणि शेजारच्या शेतकऱ्याकडून एक सुई उसनी आणायला सांगितली.

शिष्य शेतकऱ्याकडे गेले आणि त्यांनी सुई मागितली. शेतकरी घरात जाऊन सुई घेऊन आला.

तेवढ्या वेळात शिष्यांमध्ये सुई परत कशी घेऊन जाणार यावरून भांडण सुरु झाले.



"कोणीही एकाने सुई धरा." शेतकरी म्हणाला.

"महोदय, जे काही करू ते आम्हाला मिळून करावे लागेल." शिष्य म्हणाले.

शेतकऱ्याला गम्मत वाटली. "माझ्या शेतात एक नारळाचा बुंधा पडला आहे, त्यात सुई टोचा आणि घेऊन जा." त्याने हसून मिश्किल सल्ला दिला. शिष्यांना मात्र ही कल्पना फारच आवडली.





त्यांनी बुंध्यात सुई टोचली आणि आपल्या गुरूंकडे बुंधा घेऊन गेले. सर्व गावकरी हे पाहून हसत होते, पण शिष्यांना त्याची तमा नव्हती.

आपल्या शिष्यांना अश्या प्रकारे बुंधा आणताना पाहून गुरु अवाक झाले.



नंतर शेतकऱ्याला सुई परत करण्याच्या वेळेला सुद्धा शिष्यांनी बुंध्यातच सुई टोचून परत नेली. शेतकऱ्याची आणि त्याच्या बायकोची हे दृश्य पाहून हसून हसून पुरेवाट झाली.

मराठी –
मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# हरीण आणि घोडा



खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. तेव्हां घोडे जंगलात राहत असत.

एकदा हरीण आणि घोडा यांचे भांडण झाले. हरणाने घोड्याला शिंगे मारून पळवून लावले.



घोड्याने एका मनुष्याकडे मदत मागितली. माणसाने घोड्यावर खोगीर घातली, रिकीब घातली आणि घोड्यावर स्वर होऊन त्याने हरणाला पळवून लावले.



"मनुष्या! तू मला खूप मदत केलीस. धन्यवाद! आता मी तुझी रजा घेतो." घोडा म्हणाला.

"तुझा मला खूप उपयोग होऊ शकतो. मी तुला नाही जाऊ देणार." माणूस म्हणाला. तेव्हांपासून माणसाने घोड्यांना कामाला जुंपले आहे.

# जगण्याचे शास्त्र

ईश्वरैय्याने अनेक शास्त्रांचा अभ्यास केला होता, आणि त्याबद्दल त्याला गर्व होता. एकदा नदी पार करून त्याला दुसऱ्या गावाला जायचे होते म्हणून तो एका नावाड्याच्या बोटीत बसला.

"तुला भूगोलाबद्दल काही माहित आहे का?" त्याने नावाड्याला विचारले. "नाही साहेब. नाही माहित." नावाडी म्हणाला.

"मग तुझे अर्धे आयुष्य फुकट गेले असेच म्हणावे लागेल. बरे, तू समुद्राच्या नियमांबद्दल वाचले आहेस की?" त्याने पुढे विचारले.

"नाही साहेब, नाही वाचले." नावाडी उदास होऊन म्हणाला.





"मग तर तुझे पूर्ण आयुष्य फुकट गेले असेच म्हणावे लागेल. आता तरी शास्त्र वाचणे सुरु कर!" ईश्वरैय्याने सल्ला दिला.

तेवढ्यात मुसळधार पाऊस सुरु झाला. "बोट बुडण्याची शक्यता आहे. आपण नदीत उडी मारून पोहत किनारा गाठला पाहिजे." नावाडी म्हणाला. "तुम्हाला पोहोता येते ना?"

"नाही! नाही येत! मी पंडित आहे, मला वाचव!" ईश्वरैय्या घाबरून म्हणाला.

"महोदय, मी तुम्हाला नाही वाचवू शकत. तुम्हाला पोहोता येत नाही म्हणून तुमचे प्राण धोक्यात आहेत. मी शास्त्र वाचले नसले तरी मी 'जगण्याचे शास्त्र' शिकलो आहे." असे म्हणून नावाड्याने नदीत उडी घेतली आणि पोहत पोहत सुखरूप काठावर पोहोचला.

मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# घर बदल



एका गावात एक श्रीमंत माणूस राहत होता. त्याच्या घराच्या उजव्या बाजूला एक लोहार राहत असे आणि डाव्या बाजूला सुतार. लोहाराच्या घरातून सदैव धातूवर घण घातल्याचे "ढाण! ढाण!" असे आवाज येत. सुताराच्या घरातून सदैव लाकूड कापल्याचे "खर्र खर्र" असे आवाज येत.

तो श्रीमंत माणूस या आवाजाने हैराण झाला होता.



"या आवाजांपासून सुटका कशी मिळवता येईल?" तो दिवस रात्र विचार करत असे. शेवटी त्याला एक कल्पना सुचली.

त्याने लोहाराला आणि सुताराला भेटायला बोलावले आणि सांगितले, "तुमच्या आवाजांमुळे मला शांत झोप लागत नाही. तुम्ही कृपया घर बदला. मी तुम्हाला दोघांना घर बदलण्याचा खर्च सुद्धा देतो."



"ठीक आहे. तुम्ही म्हणता तसे आम्ही करू." दोघांनी आश्वासन दिले आणि पैसे घेऊन ते निघून गेले.

आपापले सामान गाड्यांमध्ये भरताना त्यांना पाहून श्रीमंत माणूस खूप खुश झाला. "देव पावला! आता मी सुखात राहू शकेन!" त्याने विचार केला.



दुसऱ्या दिवशी पुन्हा त्याच "ढाण! ढाण!" आणि "खर्र खर्र" आवाजांनी त्याला जाग आली.  लोहार आणि सुताराने आपल्याला फसवले असे वाटून त्याने आपल्या नोकराला काय सुरु आहे ते पाहण्यासाठी पाठवले.

नोकर परत आला आणि त्याने सांगितले की सुतार आणि लोहार यांनी मान्य केल्या प्रमाणे घरे बदलली आहेत. सुतार लोहाराच्या घरी आणि लोहार सुताराच्या घरी राहायला गेला आहे!

मराठी- मानसी महाजन



**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# नाणी देणारे झाड



एक होता राजा. तो रोज शिकारीला जात असे. एक दिवस एक विचित्र घटना घडली. राजाला एक म्हातारा माणूस आंब्याचे झाड लावताना दिसला.

"आजोबाच्या. तुम्ही किती साधे आहेत! तुम्ही लावलेले हे झाड मोठे कधी होणार, त्याला फळे कधी येणार! तो पर्यंत तुम्ही जिवंत तरी असाल का?" राजाने विचारले.



"महाराज! झाडाला फळे येतील तेव्हां मी जिवंत नसेन कदाचित. पण माझी मुले, नातवंडे आंबे खाऊन माझी आठवण काढतील." म्हाताऱ्याने उत्तर दिले.

राजाला म्हाताऱ्याचं उत्तर आवडले. त्याने म्हाताऱ्याला दहा सोन्याची नाणी दिली. "महाराज! पहा, मी झाड लावले त्या दिवशीच झाडाने मला दहा सोन्याची नाणी दिली!"

म्हातारा म्हणाला.



# शेतकरी आणि नदीतील देवी

एका शेतकऱ्याची कुऱ्हाड नदीत पडली. तो काठावर बसून रडू लागला. नदीतील देवीला शेतकऱ्याची दया आली.

तिने शेतकऱ्यांसाठी सोन्याची कुऱ्हाड आणली. "ही आहे का तुझी कुऱ्हाड?" तिने विचारले. "नाही, ही कुऱ्हाड माझी नाही" शेतकरी म्हणाला. मग देवीने चांदीची कुऱ्हाड आणली. "ही सुद्धा माझी नाही." शेतकरी म्हणाला. मग देवीने शेतकऱ्याची कुऱ्हाड आणली. "हीच आहे माझी कुऱ्हाड!" शेतकरी आनंदून म्हणाला. देवी शेतकऱ्याच्या प्रामाणिकपणावर खुश झाली आणि तिने

त्याला तीनही कुऱ्हाडी बक्षीस म्हणून दिल्या.



शेतकरी घरी आला आणि त्याने कुऱ्हाडी मित्रांना दाखवून सगळी हकीकत सांगितली.

त्यापैकी एक मित्र खूप हावरट होता. तो नदीजवळ गेला आणि कुऱ्हाड नदीत टाकून रडू लागला. देवी सोन्याची कुऱ्हाड घेऊन वर आली. "ही आहे का तुझी कुऱ्हाड?" तिने विचारले. मित्र आनंदाने म्हणाला, "हो! हो! हीच माझी कुऱ्हाड!" त्याचे खोटे बोलणे देवीला लगेच समजले, आणि तिने त्याला सोन्याची कुऱ्हाड तर दिलीच नाही, त्याची स्वतःची कुऱ्हाड सुद्धा दिली नाही!



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# सोन्याचा स्पर्श



एका गावात कोटय्या नावाचा व्यापारी राहत असे. त्याच्याकडे एवढे पैसे होते की गावकरी त्याला "मोहोरांचा कोटय्या" म्हणत. त्याच्याकडे खूप सोने सुद्‌धा होते. पण तो खुश नसे, त्याला अजून सोने हवे असे वाटे.



एक दिवस कोटय्या पहाटे लवकर उठला आणि अंघोळ करून जवळच्या ताळ्यावर गेला. तिथे बसून प्रार्थना करू लागला.

देवी प्रसन्न झाली आणि तिने त्याला एक वर दिला. "हवे ते मग!" देवी म्हणाली. "मला खूप सोने हवे आहे." कोटय्याने सांगितले. "किती सोने हवे?" देवीने विचारले. "मी ज्याला स्पर्श करेन ते सगळे सोन्याचे व्हावे!" कोटय्या म्हणाला. "ठीक आहे. असेच होईल!" देवीने वरदान दिले.



घरी आल्यावर "मोहोरांच्या कोटय्या"ने पलंगाला हात लावला. पलंग सोन्याचा झाला! मग बागेत जाऊन त्याने झाडांना हात लावला, ती सुद्धा सोन्याची झाली. कापसाच्या झाडांना हात लावला तर ती सुद्धा सोन्याची झाली.

घरी येऊन त्याने बायकोला जेवायला वाढायला सांगितले. पण घास हातात घेताच तो सुद्धा सोन्याचा झाला! तहान लागल्यावर त्याने पाणी प्यायला घेतले. पाण्याचे भांडे आणि आतले पाणी सुद्धा सोन्याचे झाले. आतापर्यंत कोटय्या खूप खुश होता, पण आता त्याला खूप भूक आणि तहान लागली होती.





तेवढ्यात त्याची छोटी मुलगी खोलीत आली. तिला जवळ घेताच तीसुद्धा सोन्याची झाली!

अश्रू गाळत कोटय्याने देवीचे स्मरण केले. मदत मागितली. देवी प्रकट झाली. "मला सोने नको! मला माझी मुलगी परत हवी! हे वरदान कृपया परत घे." असे म्हणून कोटय्याने देवीच्या पायाशी लोळण घातले.

देवीने कोटय्याची मागणी मान्य केली. सगळे पुन्हा पूर्ववत झाले.

आपल्या मुलीला पुन्हा जिवंत झालेली पाहून कोटय्या आनंदला.

मराठी –
मानसी महाजन

**A Bagful of Stories**
*Published by*
**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions

# पक्षिणीची पिल्ले



एका पक्षिणीने ज्वारीच्या शेतात घरटे बांधले आणि त्यात अंडी दिली. अंड्यामधून पिले बाहेर आली. ज्वारीचे पीक कापणीसाठी तयार होते. पिलांसाठी अन्न आणायला जाताना पक्षिणीने पिलांना शेतकरी काय बोलतात हे लक्ष देऊन ऐकायला सांगितले.



पक्षीण परत घरट्यात आला तेव्हा पिले घाबरून म्हणाली, "आई! आज शेतकरी त्याच्या मुलांना घेऊन आला होता. उद्या सगळ्या नातलगांना पीक कापायला बोलावले आहे."

"घाबरू नका. उद्या कापणी होणार नाही." पक्षीण म्हणाली.



दुसऱ्या दिवशी पुन्हा त्याच सूचना देऊन ती अन्न आणण्यासाठी गेली.

संध्याकाळी पिल्ले म्हणाली, "आई! आज पुन्हा शेतकरी मुलांना घेऊन आला होता. त्यांचे नातलग कामात होते त्यामुळे उद्या शेजाऱ्यांना घेऊन ते कापणी करणार आहेत.“ "घाबरू नका. उद्या कापणी होणार नाही." पक्षीण म्हणाली.



तिसऱ्या दिवशी पुन्हा त्याच सूचना देऊन पक्षीण गेली. संध्याकाळी पिल्लांनी सांगितले. "आई! आज पुन्हा शेतकरी आणि त्याची मुले आली होती. शेजारी काही आले नाहीत, त्यामुळे उद्या ते स्वतः कापणी करणार आहेत."

"शेतकरी स्वतः कापणी करण्याच्या विचारात असेल तर नक्कीच कापणी होणार. आपल्याला ताबडतोब दुसरी जागा शोधायला हवी." पक्षीण म्हणाली आणि पिल्लांना घेऊन नव्या जागेच्या शोधात उडून गेली.

# कासवाला धडा मिळाला



एकदा कासवाने गरुडाला आपल्याला उडायला शिकव अशी गळ घातली. गरुडाने सल्ला दिला की उडणे हे काही कासवासाठी योग्य नाही.

पण कासव त्याची पाठ सोडेना.

मग गरुडाने कासवाला उचलले आणि उंच भरारी घेतली. त्याने आकाशात गेल्यावर कासवाला खाली पाहायला सांगितले. कासवाने वाकून पाहिले तेव्हा आपण किती उंचावर आलो आहोत हे त्याला जाणवले. "इथून जर मी खाली पडलो, तर नक्कीच कवच फुटून मरेन!" त्याने विचार केला. "मला उडायचे नाही!" तो म्हणाला, "मला जमिनीवर घेऊन चल!"



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

*Published by*

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tarnaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614, Illustrations: S. Pavani, Printed at Charita Impressions

# ओढा ओलांडला



चीन मध्ये एका गावात एक तबेला होता. तबेल्यातले घोडे दिवसभर शेते नांगरत आणि बग्ग्या ओढत.

या घोड्यांमध्ये एक शुभ्र घोडा होता, ज्याला एक बाळ, म्हणजे शिंगरू होते.

"हे गव्हाचे पोते गिरणीत घेऊन जा." आईने सांगितले. शिंगराने पोते पाठीवर टाकले आणि धावत निघाला.





वाटेत एक झुळूझुळू वाहणारा ओढा होता.

शिंगराला ओढ्याजवळ बसलेला एक बैल दिसला. "बैलोबा, मी ओढा पार करू शकेन का?"

"ओढा तसा खोल नाही. गुडघ्यापर्यंतच पाणी आहे. मी कालच त्या बाजूने आलो." बैल म्हणाला. शिंगरू हळूच पाण्यात उतरले.

तेवढ्यात एक खार पळत आली. "थांब थांब! ओढा खूप खोल आहे. कालच माझा एक मित्र ओढा पार करताना बुडला." हे ऐकून शिंगरू लगेच मागे आले.

बिचारे पुन्हा आईकडे गेले. त्याला एवढे लवकर परत आलेले पाहून आईला आश्चर्य वाटले. "एवढ्या लवकर कसा परत आलास?' तिने विचारले.

"आई, वाटेत एक ओढा आहे. तो किती खोल आहे हे मला समजले नाही." शिंगरू म्हणाले. "बैल म्हणाला मी पार करू शकेन, पण खार म्हणाली मी बुडू शकेन. मी काय करू?" त्याने विचारले.

आईला हसू आवरेना. "बैल किती मोठा आहे? खार किती मोठी आहे? त्या दोघांशी स्वतःची तुलना कर, म्हणजे तुला ठरवता येईल की तुला ओढा ओलांडता येईल का नाही!"



शिंगरू पुन्हा ओढ्याजवळ गेले. "मी बैलाएवढा मोठाही नाही, आणि खारी एवढा लहानही नाही." त्याने विचार केला आणि ओढ्यात उतरला. ओढा ओलांडून तो सुखरूप गिरणीत पोहोचला, आणि पोते देऊन घरी परतला.

"शाब्बास!" आईने कौतुक केले.



मराठी - मानसी महाजन

**A Bagful of Stories**

***Published by***

**Manchi Pustakam**

12-3-439, Street No. 1, Tamaka, Secunderabad - 17, e-mail: info@manchipustakam.in; Ph.: 94907 46614; Illustrations: S. Pavani; Printed at Charita Impressions